महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, विद्यापीठाचे वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील शैक्षणीक संकुल, मुला-मलींचे वस्तीगृह, ॲमेनिटी ब्लॉक व प्रशासकीय संकुल या इमारतींमध्ये हिटींग, व्हेटीलेशन व एअर कन्डींशन यंत्रणा स्थापित करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.एनएलयुएन-२०२१/प्र.क्र.०६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३.

**पहा :-** १) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांचे दि.१०.०७.२०२२.
२) उच्चाधिकार सचिव समितीची दि.०५.०८.२०२२ रोजीची बैठक.
३) मा.मंत्रीमंडळाची दि.१७.११.२०२२ रोजीची बैठक.
४) विभागाचा समक्रमांकाचा दि.०२.१२.२०२२ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपुर या विद्यापीठाकरिता शासनाने मौजे वारंगा येथे ६० एकर जमीन महसुल व वन विभागाच्या दि.१७.०७.२०१६ च्या शासन आदेशान्वये मंजूर करण्यात आली. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपुर हे दि.०१ एप्रिल, २०१६ पासून सुरु झालेले आहे. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, विद्यापीठाचे वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील शैक्षणीक संकुल, मुला-मलींचे वस्तीगृह, ॲमेनिटी ब्लॉक व प्रशासकीय संकुल या इमारतींसाठी हिटींग, व्हेटीलेशन व एअर कन्डींशन यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठी लागणारा आवश्यक खर्च रु.२५.८५ कोटी किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये विनंती केली होती. सदरची यंत्रणा ही दि.२७.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील बांधकामापैकी शैक्षणीक संकुल (Academic Block) व प्रशासकीय संकुल (Administrative Block) मध्ये तसेच दि.१७.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील बांधकामापैकी मुलांमुलींचे वसतिगृह व ॲमेनिटी ब्लॉक मध्ये स्थापीत करावयाची आहे.

सदरहु प्रस्तावाची सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक पडताळणी करुन रु.२५८५.९१ लक्ष इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता दिली असून, उच्चस्तरीय सचिव समितीने सुध्दा मान्यता दिली आहे. तसेच या कामास दि.१७.११.२०२२ च्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता दिली आहे. सदरहू मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील दि.०२.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील शैक्षणीक संकुल, मुला-मलींचे वस्तीगृह, ॲमेनिटी ब्लॉक व प्रशासकीय संकुल या इमारतींमध्ये हिटींग, व्हेटीलेशन व एअर कन्डींशन यंत्रणा स्थापित करण्यासाठी येणाऱ्या खर्चासाठी रु.२५८५.९१ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरहू मान्यतेच्या अनुषंगाने या कामाकरीता पुरवणी मागणीद्वारे निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दिली आहे. तद्नुषंगाने या कामाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, विद्यापीठाचे वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील शैक्षणीक संकुल, मुला-मलींचे वस्तीगृह, ॲमेनिटी ब्लॉक व प्रशासकीय संकुल या

इमारतींमध्ये हिटींग, व्हेटीलेशन व एअर कन्डींशन यंत्रणा स्थापित करण्यासाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु.२५,८५,९१,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी पंच्याऐंशी लक्ष एक्याण्णव हजार फक्त) एवढा निधी खालील अटीच्या अधीन राहुन वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे

१. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

२. कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

३. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२२, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०२२११२५४५६५२०८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.02.21 13:01:58 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. कुलपती महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
३. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
६. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सहसंचालक (उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१०. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
१३. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१५. मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.